रोजगार व स्वयंरोजगार विभागाचा संगणकीकरण प्रकल्प राबविण्यासाठी स्थापन करण्यात आलेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीची पुनर्रचना करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
रोजगार व स्वयंरोजगार विभाग
शासन निर्णय : इएसई-२००३/प्र.क्र.२०/रोस्वरो-१
नवीन प्रशासन भवन, १४वा मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा चौक, मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०३२.
दिनांक २७ जून, २०११.

**संदर्भ :** १. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीओएम-१००१/प्र.क्र.१७४/०१/३९, दि.२९/१०/२००१
२. शासन निर्णय, रोजगार व स्वयंरोजगार विभाग क्र.इएसई-२००३/प्र.क्र.२०/रोस्वरो-१, दि.१७/०७/२००३.
३. शासन शुध्दीपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीओएम-१००१/प्र.क्र.१७४/०१/३९, दि.२८/०३/२००५.

**प्रस्तावना :**

उपरोक्त संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये विभागाच्या संगणकीकरणाचा मोठा प्रकल्प राबविण्यासाठी प्रत्येक विभागांतर्गत प्रकल्प अंमलबजावणी समितीची स्थापना करणे आवश्यक आहे. त्यानुसार, उपरोक्त शासन निर्णयातील तरतुदींच्या अधिन राहून रोजगार व स्वयंरोजगार विभागाचा संगणकीकरण प्रकल्प राबविण्यासाठी संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये प्रकल्प अंमलबजावणी समितीची स्थापना करण्यात आली आहे. सध्या कार्यान्वित असलेली रोजगार वाहिनी वेबपोर्टल व रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रातून वापरण्यात येत असलेले क्लायंट सर्व्हर तंत्रज्ञानावर आधारलेले रोजगार मित्र सॉफटवेअर यांच्या मर्यादा विचारात घेवून रोजगार व स्वयंरोजगार विभागासाठी सर्वंकष ई-प्रशासन प्रणाली प्रकल्पास मा.मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीने मान्यता दिली आहे. यापुढील प्रकल्पाची संपूर्ण अंमलबजावणी प्रकल्प अंमलबजावणी समितीमार्फत होणे आवश्यक आहे. शासन शुध्दीपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीओएम-१००१/प्र.क्र.१७४/०१/३९, दिनांक २८/३/२००५ अन्वये प्रकल्प अंमलबजावणी समितीत माहिती तंत्रज्ञान संचालनालयामार्फत जाहीर करण्यात अलेल्या तज्ञ मंडळातील किमान एका तज्ञाची माहिती तंत्रज्ञान संचालनालयाच्या संमतीने सदस्य म्हणून नियुक्ती करणे बंधनकारक आहे. सर्वंकष ई-प्रशासन प्रणाली प्रकल्पाचे स्वरुप व तांत्रिक व्याप्ती विचारात घेता प्रकल्प अंमलबजावणी समितीस तांत्रिक मार्गदर्शनासाठी दोन तज्ञ सदस्यांचा प्रकल्प अंमलबजावणी समितीमध्ये समावेश करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

रोजगार व स्वयंरोजगार विभागाचा संगणकीकरण प्रकल्प राबविण्यासाठी उपरोक्त संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये प्रकल्प अंमलबजावणी समितीची स्थापना करण्यात आली आहे. उपरोक्त संदर्भ क्र.१ च्या

शासन निर्णयतील तरतुदींच्या अधिन राहून रोजगार व स्वयंरोजगार विभागाचा सर्वंकष ई-प्रशासन प्रकल्प राबविण्यासाठी खालीलप्रमाणे प्रकल्प अंमलबजावणी समितीची पुनर्रचना करण्यात येत आहे :-

| | |
|---|---|
| १. प्रधान सचिव, रोजगार व स्वयंरोजगार | : अध्यक्ष |
| २. सचिव, माहिती तंत्रज्ञान | : सदस्य |
| ३. आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय | : सदस्य |
| ४. उप सचिव, वित्त विभाग | : सदस्य |
| ५. उप सचिव, नियोजन विभाग | : सदस्य |
| ६. प्रो.पी.के.पंडया, टाटा इन्स्टीटयूट ऑफ फंडामेन्टल रिसर्च (TIFR),मुंबई | : तज्ञ सदस्य |
| ७. महाव्यवस्थापक, व्यवसाय विकास, भारत संचार निगम लि. (BSNL) मुंबई किंवा त्यांचे प्रतिनिधी | : तज्ञ सदस्य |
| ८. उप संचालक, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय | : सदस्य-सचिव |

वरील दोन तज्ञ सदस्यांना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीओएम-१०९८/प्र.क्र.५१/९८/३९, दि.१५/०२/२००५ मधील तरतुदीनुसार या विभागाच्या संगणकीकरण अंमलबजावणी समितीच्या बैठकांना उपस्थित राहिल्याबद्दल प्रति बैठक रु.१०००/- एवढे एकत्रित मानधन (प्रवासभत्त्यासह) अनुज्ञेय राहिल.

२. ही समिती शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीओएम-१००१/प्र.क्र.१७४/०१/३९, दि.२९/१०/२००१ अन्वये विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार काम करेल. हा शासन निर्णय माहिती तंत्रज्ञान संचालनालयाच्या सहमतीने व अनौपचारीक संदर्भ क्र. २४६ दि. २४/०६/२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०११०६२७१३२४३३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

सही/-
(श.मा.साठे)
शासनाचे अवर सचिव

प्रत :

मा. राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा.उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व मा.विधान सभा/मा.विधान परिषद सदस्य,
महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १/२, मुंबई/नागपूर,

मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव,
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
सचिव, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास, कोकण भवन, नवी मुंबई,
प्रो.पी.के.पंडया, टाटा इन्स्टीटयूट ऑफ फंडामेन्टल रिसर्च (TIFR),मुंबई
महाव्यवस्थापक,व्यवसाय विकास, भारत संचार निगम लि., (BSNL) मुंबई,
उप संचालक, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई,
रोजगार व स्वयंरोजगार विभागातील सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई,
निवडनस्ती, रोजगार व स्वयंरोजगार विभाग (रोस्वरो-१)